**सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखालील आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर कार्यरत वैद्यकीय अधिका-यांनी सेवांतर्गत पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतल्यामुळे रिक्त राहणारी पदे भरण्यासाठी आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेली ५४५ अधिसंख्य पदे उप संचालक स्तरावर विभागून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०२१/प्र.क्र.०१/सेवा-३**
१० वा मजला, गो.ते. रुग्णालय, संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : ०८ एप्रिल, २०२२

वाचा : १) शासन निर्णय क्र.पदनि-२०१५/प्र.क्र.४४१/सेवा-३, दि.१४.१२.२०१६.
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र.आआसे/अधिसंख्य पदे/अडचणी/पीजी कक्ष/१०४९/२०२१, दि.०७.१०.२०२१.
३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/पी.जी.सेल/अधिसंख्य पदांचे वर्गीकरण/१३२/२०२२, दि.११.०३.२०२२.

**प्रस्तावना:-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखालील आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर कार्यरत वैद्यकीय अधिका-यांनी सेवांतर्गत पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतल्यामुळे रिक्त राहणारी पदे भरण्यासाठी वाचा येथील शासन निर्णय दि.१४.१२.२०१६ अन्वये आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर ५४५ वैद्यकीय अधिका-यांची अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली होती. सद्यस्थितीत सेवांतर्गत पदव्युत्तर पदवी/पदविका अभ्यासक्रमासाठी कार्यरत असलेल्या वैद्यकीय अधिका-यांचे वेतन आयुक्तालयस्तरावर अधिसंख्य पदावरुन अदा करण्यात येते. सदर अधिसंख्य पदे ही संपूर्ण महाराष्ट्रात विविध आरोग्य संस्थामध्ये असल्यामुळे त्यांचे नियंत्रण करतेवेळी अंतिम वेतन प्रमाणपत्रे , सेवा पुस्तके, रजेचा तपशिल प्राप्त होण्यास बराच कालावधी निघुन जात असल्यामुळे संबंधीत अधिका-यांचे वेतन व भत्ते वेळेवर अदा करणे शक्य होत नाही. त्यामध्ये जास्त अडचणी येत असल्यामुळे ज्या ठिकाणी संबंधीत वैद्यकीय अधिकारी कार्यरत आहेत त्याच ठिकाणच्या संबंधित उपसंचालक यांच्या स्तरावर सदर अधिसंख्य पदे विभागून देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-**

प्रशासकीय कारणांमुळे आरोग्य सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर ५४५ अधिसंख्य पदांचे नियंत्रण ठेवणे अडचणीचे होत असल्यामुळे सदरची अधिसंख्य पदे उप संचालक स्तरावर विभागून देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुषंगाने पदवी/पदविका अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या अधिसंख्य पदावरील वैद्यकीय अधिका-यांचे अंतिम वेतन प्रमाणपत्र, रजेचा तपशिल व इतर अनुषंगिक सेवा विषयक बाबी हाताळणे आणि त्यांचे वेतन व भत्ते व तद्नुषंगीक देय आर्थिक लाभ उप संचालक स्तरावरुन अदा करण्यात यावे.

२. सदर ५४५ अधिसंख्य पदांचे उप संचालक स्तरावर खालीलप्रमाणे वर्गीकरण करण्यात येत आहे.

| **क्र.** | **परिमंडळ** | **अधिसंख्य पदांचे उप संचालक निहाय वर्गीकरण** |
|---|---|---|
| १ | ठाणे | ५० |
| २ | पुणे | ७० |
| ३ | नाशिक | ७५ |
| ४ | कोल्हापूर | ५० |
| ५ | औरंगाबाद | ७५ |
| ६ | लातूर | ७५ |
| ७ | अकोला | ७५ |
| ८ | नागपूर | ७५ |
| | **एकूण** | **५४५** |

३. उप संचालक स्तरावर अधिसंख्य पदांचे वेतनासाठी उपलब्ध असलेले लेखाशिर्ष खालीलप्रमाणे आहे:-

मागणी क्रमांक - आर-१

मुख्य लेखाशिर्ष “२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

(०१)(०४) -* गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१) (०१) वेतन”

४. आयुक्तालय स्तरावर सध्या अधिसंख्य पदांवर कार्यरत असलेल्या वैद्यकीय अधिकारी यांचे वेतन व आस्थापनाविषयक बाबी यापुढे संबंधित उप संचालक स्तरावरुन हाताळण्यात याव्यात.

५. सदर पदे जरी उप संचालक स्तरावर प्रशासकीय सोयीकरीता तात्पुरत्या स्वरुपात निर्माण करण्यात आले असले तरी, सदर पदांचा एकत्रित गोषवारा किंवा तपशिल याबाबत संचालनालयामार्फत वेळोवेळी आढावा घेण्यात यावा. तसेच सदर पदे अस्थायी स्वरुपाची असल्याने त्यांना मुदतवाढ देण्याकरीता संचालनालयामार्फत एकत्रित प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२८१६२३२२२४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात ये आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.04.08 15:55:10 +05'30'

**(वि.ल. लहाने)**
**शासनाचे सह सचिव.**

**प्रत,**

१) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
३) उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ (सर्व).
४) निवडनस्ती (सेवा-३)